भंडारा जिल्हा कारागृह येथे दोन नवीन बराकी बांधण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक- बांधका २००२/प्र.क्र.१७८/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २४ जानेवारी ,२००३.

पहाः- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-बीएलडी/१०२००२/पुवि-११,दिनांक २१.११.२००२.

२) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१.

शासन निर्णयः- भंडारा जिल्हा कारागृह येथे क्षमतेपेक्षा जास्त बंदयांना ठेवण्यात आले आहे. बंदी कोठडयामध्ये प्रमाणापेक्षा जास्त बंदी ठेवल्याने त्यांच्या आरोग्यावर विपरीत परिणाम होत आहे. त्याशिवाय विरोधी गटातील बंदी एकत्र आल्याने त्यांच्यात भांडणे व मारामाऱ्या होतात. अशा परिस्थितीमुळे एका कैदयाने श्री. छोटेखाँ पठाण याने मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे क्रि.रि.पि.क्र.१७६/२००२ हे दाखल केले आहे. सदर याचिकेच्या सुनावणीच्या वेळी न्यायालयाने कैदयांना ठेवण्यासाठी पुरेशी व्यवस्था शासनाने तातडीने करावी असे आदेश दिले आहेत. या सर्व बाबी विचारात घेऊन कारागृह महानिरीक्षक यांनी भंडारा जिल्हा कारागृह येथे दोन नवीन बराकी बांधण्याबाबतचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला आहे.

२. भंडारा जिल्हा कारागृह येथे दोन नवीन बराकी बांधण्यासाठी येणारा खर्च रु. ४१,९६,१००/-चे खर्चाचे अंदाजपत्रक व बांधकामाचा नकाशा कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला असून या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी शासनास विनंती केली आहे.प्रस्तावातील खर्चाचे अंदाजपत्रक व बांधकामाचा नकाशा हा कार्यकारी अभियंता व उपअभियंता सार्व जनिक बांधकाम विभाग मंडळ भंडारा यांनी मंजूर केले असून प्रस्तावास मान्यता देण्याबाबत विनंती केली आहे. तथापि कारागृह महानिरीक्षक यांनी रु. ४१,९६,१००/-चा खर्चाचा प्रस्ताव मंजूरीसाठी शासनास सादर केला असला तरी सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय यांनी दक्षता व गुणनियंत्रण इत्यादी साठी असलेली १५ % तरतूद वगळून रु. ३६,८४,७००/- च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता दिली आहे.

२. भंडारा जिल्हा कारागृह येथे दोन नवीन बराकी बांधण्याच्यासंबंधीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब कांही काळ शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन या आदेशाद्वारे तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग पाच मधील विवरणपत्रामील अ.क्र.१ व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील ,परिच्छेद क्र.१३४ मधील अटीच्या अधिन राहून व वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक- .विअप्र- १००० /प्र.क्र.४६ /२००१/विनियम दिनांक ११.७.२००१ च्या आदेशाद्वारे मंत्रालयीन प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन या आदेशाद्वारे " भंडारा जिल्हा कारागृह येथे दोन नवीन बराकी बांधण्यासाठी होणारा खर्च रु. ३६,८४,७००/- ( रु. छत्तीस लाख चौऱ्यांऐंशी हजार सातशे फक्त) च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देत आहे.

१) अर्थसंकल्पात खर्चाची तरतूद झाल्याखेरीज प्रशासकीय मान्यतेबरोबर वित्तिय मान्यता गृहीत धरु नये.

२) अर्थसंकल्पात खर्चाची तरतूद झाल्याखेरीज प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करून नये.

३) मान्यता मिळालेल्या अनुदानातूनच बांधकाम पूर्ण करण्यात यावे. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

४) प्रस्तावित काम सुरुवात झाल्यापासून ४ वर्षाच्या आत पूर्ण होईल असे नियोजन करावे.

३. यासाठी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,प्रमुख बांधकामे "(००)(१०) (तुरुंग) (४०५९०११७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा

५. हा शासन निर्णय विभागाच्या प्रधान सचिवांच्या मान्यतेने तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग व नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३६/पीएसपीडी/का.१४११/ दिनांक २.१.२००३ च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(र.म.[illegible])
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,
कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,पूर्व विभाग,मध्यवर्ती कारागृह नागपूर.
अधिक्षक,भंडारा जिल्हा कारागृह,भंडारा.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
महालेखापाल ,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा)नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
वित्त विभाग(व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग(कार्यासन-१४११)मंत्रालय,मुंबई
सार्वजनिक बांधकाम विभाग(इमा-२)मंत्रालय,मुंबई
अवर सचिव,गृह विभाग,पोयुडी-१,मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती- पीआरएस-२.